**मनोधैर्य योजनेअंतर्गत पिडीत महिला व बालकांना तातडीने अर्थसहाय्य देण्याकरीता निधी वितरीत करणेबाबत... योजनांतर्गत (Plan)**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२९५/का-२**

नवीन प्रशासकीय इमारत, ३रा मजला,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २८ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :-**

१) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३, दि.१ जुलै, २०१४.**

२) **उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ /तरतूद /वितरण /१४-१५ /का-६./४०८३, दि.३.७.२०१४.**

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये मनोधैर्य योजनेअंतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पात मंजूर झालेल्या रू.१५,१०,९०,०००/- इतक्या निधीपैकी रू.५,०३,६०,०००/- इतका निधी BDS वर उपलब्ध करून दिला होता. मनोधैर्य योजनेंतर्गत सदर योजना सुरु झाल्यापासून माहे आक्टोबर, २०१३ ते दिनांक १२.८.२०१४ पर्यंत एकूण प्राप्त झालेल्या प्रकरणात **अवितरीत पूर्ण निधीची आवश्यकता असल्याने** तातडीने अर्थसहाय्य देण्यासाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या निधीपैकी **अवितरीत** १००% निधी BDS वर वितरीत करण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली होती. यानुसार

वित्त विभागाने मनोधैर्य योजनेंतर्गत लाभार्थ्यांना तातडीने अर्थसहाय्य देण्याकरीता सन २०१४-१५ करीता अर्थसंकल्पात मंजूर झालेला १००% निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे.

## शासन निर्णय—

सन २०१४-१५ मध्ये पिडित महिला व बालकांना तातडीने अर्थसहाय्य व त्यांचे पुनर्वसन करण्यासाठी मनोधैर्य योजनेंतर्गत एकूण मंजूर तरतूदीच्या अनुषंगाने वित्त विभागाने मंजूर केलेला निधीचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | उपशिर्ष | उद्दीष्ट | सन २०१४-१५ अर्थसंकल्पीय तरतूद | वित्त विभागाने मंजूर केलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २२३५-बी-१८३ | ३१- सहायक अनुदान (वेतनेत्तर) पिडित महिला आणि बालक "मनोधैर्य योजना" | रु.१५,१०,९०,०००/- | रु.१५,१०,९०,०००/- |

२. शासन परिपत्रक वित्त विभाग दिनांक १.७.२०१४ मधील परिच्छेद-१० नुसार उपरोक्त लेखाशिर्षाखाली यापूर्वीच्या सहाय्यक अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीतांकडून त्वरीत प्राप्त करुन घेण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे ह्यांनी घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/१०.८०/प्र.क्र.७०/२००८ विनिमय, दिनांक १५.५.२००९ भाग पहिला, उप विभाग-३/परिच्छेद-२७(२)(ब) अन्वये विभागाला प्रदान करण्यात

आलेल्या अधिकारास अनुसरुन वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४८/व्यय-६, दिनांक २२.८.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०११४०५८८२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Women & Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahendra Babusing Hajari
Date: 2014.08.30 12:31:05 +05'30'

**( म.बा. हजारी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर
४. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
७. वित्त विभाग (व्यय-६)(अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, का-२